**स्थायीकरणाचे प्रमाणपत्र देण्याच्या**
**<u>अधिकारांचे प्रत्यार्पन करणेबाबत..</u>**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः स्थाप्रप्र-२०२०/प्र.क्र. ०१/सेवा-१**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत ८ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २६ ऑगस्ट, २०२०.

<u>वाचा :-</u>

**१) शासन परिपत्रक, सामान्य प्राशासन विभाग, क्रमांक : स्थाप्रप्र-१४१४/(प्र.क्र. ७३/१४)/ १३-अ, दिनांक ११.०९.२०१४.**

**२) शासन परिपत्रक, सामान्य प्राशासन विभाग, क्रमांक : स्थाप्रप्र-१४१५/(प्र.क्र. ९७/१५)/ १३-अ, दिनांक २१.०८.२०१५.**

<u>प्रस्तावना :-</u>

वाचावे येथील शासन परिपत्रक क्रमांक (१) अन्वये प्रत्येक अस्थायी शासकीय अधिकारी/कर्मचा-यांस स्थायित्व प्रमाणपत्र प्रथम पदावरील नियुक्तीच्या संदर्भात देणेबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर परिपत्रकातील तरतुदीनुसार गट-अ व गट-ब (राजपत्रित) या अधिका-यांबाबत नियुक्ती प्राधिकारी यांना "स्थायित्व प्रमाणपत्र" देण्याचे अधिकार आहेत. प्रशासनात गतिमानता येण्यासाठी निर्णय घेण्याचे अधिकार आवश्यकतेनुसार वाचावे येथील परिपत्रक क्रमांक (२) अन्वये प्रशासकीय विभागाच्या अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना "स्थायित्व प्रमाणपत्र" देण्याचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात आले आहेत.

२. आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी गट-ब, सामान्य राज्य सेवा गट-ब मधील दंतशल्यचिकित्सक व इतर पदे, गट-ब संवर्गातील इतर अधिकारी, तसेच राज्य कामगार विमा योजना रुग्णालयातील गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) संवर्गातील वैद्यकीय अधिकारी व इतर अधिकारी यांची संख्या विचारात घेता, दरवर्षी स्थायित्व प्रमाणपत्राकरीता पात्र अधिका-यांची संख्या जास्त आहे. तसेच, संबंधित संवर्गातील अधिका-यांचे प्रस्ताव या प्रशासकीय विभागाकडे विहित मार्गान प्राप्त होण्याकरीता बराच कालावधी लागत असल्याने "स्थायित्व प्रमाणपत्र" देण्याचे अधिकार प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने, "सेवेत स्थायिकरणाचे प्रमाणपत्र देऊन कायम करणे" या विषयाबाबत निर्णय घेण्याचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक:-**

आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गामधील वैद्यकीय अधिकारी गट-ब, सामान्य राज्य सेवा गट-ब व गट-ब संवर्गातील इतर राजपत्रित अधिकारी, तसेच राज्य कामगार विमा योजनेंतर्गत गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील वैद्यकीय अधिकारी व इतर राजपत्रित अधिकारी यांना (वेतनश्रेणी : S-२० किंवा त्यापेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले) सामान्य प्रशासन विभागाच्या वाचावे येथील अ.क्र. (१) च्या परिपत्रकामधील अटी व शर्ती अनुसार "स्थायित्व प्रमाणपत्र" देण्यात येतात. तर, सामान्य प्रशासन विभागाच्या वाचावे येथील अ.क्र. (२) च्या परिपत्रकानुसार "स्थायित्व लाभ प्रमाणपत्र" देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागाच्या अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना प्रदान करण्यात आले आहेत. आता, वेतनश्रेणी S-२० : रुपये ५६,१००-१,७७, ५०० किंवा त्यापेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत गट-ब (राजपत्रित) संवर्गातील सर्व अधिकारी आणि राज्य कामगार विमा योजनेंतर्गत गट-अ व गट-ब संवर्गातील सर्व अधिकारी यांना "स्थायित्व प्रमाणपत्र" प्रदान करण्याचे अधिकार अनुक्रमे आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई आणि आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांना प्रत्यार्पित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. "स्थायित्व प्रमाणपत्र" देण्याबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : स्थाप्रप-१४१४/(प्र.क्र. ७३/१४)/१३-अ, दिनांक ११ सप्टेंबर २०१४ मधील व सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अन्य परिपत्रकांन्वये दिलेल्या इतर सूचना कायम राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१४२९४७१७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sontakke Premanand Dnyaneshwar

Digitally signed by Sontakke Premanand Dnyaneshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=248f3abd919bce9c4e68555abc7e467b111c53a87e167edcc566a40a12ae53cd, serialNumber=89357e84059779c4ad0939baba47be1d7999cb1d37b914bdf76f412b21aac1af, cn=Sontakke Premanand Dnyaneshwar
Date: 2020.08.28 13:29:50 +05'30'

**(प्रे.ज्ञा. सोनटक्के)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

(२) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.

(३) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

(४) संचालक (वैद्यकीय/प्रशासन), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
(५) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
(६) सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे.
(७) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक.
(८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
(९) सर्व वैद्यकीय अधिक्षक/उप अधिक्षक/वैद्यकीय प्रशासन अधिकारी, रा.का.वि.योजना रुग्णालये.
(१०) महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
(११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी/अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(१२) निवडनस्ती , सेवा-१ कार्यासन, सा.आ. विभाग, मंत्रालय, मुंबई.